महाराष्ट्र - कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्ती वेतनात वाढ देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय क्रमांक : मकसी-१०१०/प्र.क्र.९१/२०१०/३६
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक :- २९ मार्च, २०११**

**वाचा :-**
१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.मकसी/हुस्माक/१०९६/प्र.क्र.१४/९६/३६, दि.१७/१०/१९९७.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.मकसी-१०९७/प्र.क्र.५४/९७/३६, दि.०८/०१/१९९९.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.मकसी-१००५/६२/प्र.क्र.१९/२००५/३६, दि.२८/१२/२००६.
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.मकसी-१००९/२१९/प्र.क्र.६/२००९/३६, दि.२८/०८/२००९.
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.संकीर्ण-२०१०/प्र.क्र.५९/१०/स्वासैक, दि.०७/१२/२०१०.

**प्रस्तावना :-** महाराष्ट्र - कर्नाटक सीमा आंदोलनात ज्या व्यक्तींनी बलिदान दिले आहे त्यांच्या वारसास म्हणजेच जवळच्या एका नातेवाईकास (विधवा पत्नी, आई किंवा वडील) रुपये १०००/- मासिक निवृत्तीवेतन व इतर आर्थिक लाभ (स्वातंत्र्य सैनिकांना मिळणाऱ्या) देण्याचा शासन निर्णय दिनांक १७/१०/१९९७ अन्वये घेण्यात आला आहे. त्यानंतर शासन निर्णय दि.०८/०१/१९९९ अन्वये महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनामध्ये सीमावर्ती क्षेत्रातील मृत्यु पावलेल्या व्यक्तींनाही हुतात्मा म्हणून जाहीर करण्यात येऊन त्यांच्या जवळच्या नातेवाईकांना निवृत्तीवेतनात वाढ देऊन दरमहा रु.१५००/- इतके निवृत्तीवेतन करण्यात आले. त्यामध्ये शासन निर्णय, दि.२८/१२/२००६ अन्वये वाढ करण्यात येऊन दरमहा रु.२५००/- इतके निवृत्तीवेतन देण्यात आले. त्याचप्रमाणे शासन निर्णय, दि.२८/०८/२००९ अन्वये सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या नातेवाईकांना दरमहा रु.६०००/- इतके निवृत्तीवेतन मंजुर करण्यात आले आहे.

शासन निर्णय, दि.०७/१२/२०१० अन्वये राज्य शासनामार्फत स्वातंत्र्य सैनिकांना देण्यात येत असलेल्या निवृत्तीवेतनात वाढ करुन सरसकट दरमहा रु.८०००/- इतके निवृत्तीवेतन दि.०२/१०/२०१० पासून मंजूर करण्यात आले आहे. महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या नातेवाईकांना स्वातंत्र्य संग्राम सैनिकांप्रमाणेच निवृत्तीवेतन व इतर आर्थिक सहाय्य देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१. महाराष्ट्र - कर्नाटक सीमा आंदोलनात ज्या व्यक्तींनी बलिदान दिले आहे त्यांच्या वारसास म्हणजेच जवळच्या एका नातेवाईकास (विधवा पत्नी, आई किंवा वडील) स्वातंत्र्य सैनिकांप्रमाणे **दरमहा रुपये ८०००/- (रुपये आठ हजार फक्त)** एवढे निवृत्तीवेतन देण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर वाढीव निवृत्तीवेतन हे **दि.०२ ऑक्टोबर,२०१०** पासून लागू करण्यात येत आहे.

२. निवृत्तीवेतन लाभ घेणाऱ्या लाभार्थींना मिळणाऱ्या प्रवासखर्च व इतर आर्थिक सवलती पूर्वीप्रमाणेच राहतील. त्यामध्ये कोणताही बदल करण्यात आलेला नाही.

३. यासाठीचा खर्च **"मागणी क्र.ए-५, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, (६०) इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम (१०२) सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृती वेतन, (००) (०३) महाराष्ट्र - कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्ती वेतन, २२३५-२४९-३"** या लेखाशिर्षाखाली **सन २०११-२०१२** या वित्तीय वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१४६/११/व्यय-४, दि.१४ मार्च, २०११ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( सि.मं.इनामदार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा.राज्यपालांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव.
४) सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव.
५) सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
७) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
९) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर.
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१२) सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक शाखा),५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२.
१३) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४) सचिव, लेखा व कोषागरे, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५) सर्व विभागीय आयुक्त.
१६) जिल्हाधिकारी, मुंबई शहर जिल्हा, जुने जकात गृह, फोर्ट, मुंबई-१. (५ प्रती)
१७) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१. (५ प्रती)
१८) जिल्हाधिकारी, जिल्हा-पुणे. (५ प्रती)
१९) जिल्हाधिकारी, जिल्हा-कोल्हापूर. (५ प्रती)
२०) जिल्हाधिकारी, जिल्हा-रत्नागिरी. (५ प्रती)
२१) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगर / पुणे / कोल्हापूर / रत्नागिरी. (५ प्रती)
२२) वित्त विभाग (अर्थसंकल्प-३ / अर्थसंकल्प-१३/ व्यय-४), मंत्रालय, मुंबई-३२.
२३) सामान्य प्रशासन विभाग **(कार्यासन-२५)**, मंत्रालय, मुंबई-३२.
२४) विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई-३२. (प्रसिध्दीसाठी)
२५) **भारतीय रिझर्व्ह बँक,** केंद्रिय कार्यालय, सहकारी बँक लेखा विभाग, केंद्रिय ऋण विभाग, सी-७, बांद्रा-कुर्ला संकुल, ३ रा मजला, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१ यांना, त्यांनी सर्व राष्ट्रीयकृत बँकांना आवश्यक त्या सूचना देण्याच्या विनंतीसह रवाना.
२६) निवड नस्ती (कार्या.३६).